**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या गट अ व गट ब संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांच्या ठोक वेतनामधेवाढ करण्याबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-१११९/ प्र.क्र. ६३/सीपीटीपी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० जानेवारी,२०२०.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.
२. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१४/प्र.क्र.९९/१४/ १२-अ, दिनांक ०९.०५.२०१४
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन- ०५१४/ प्र.क्र.१८/१८-ब, दिनांक ०८.०८.२०१४
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन- ०११९ / प्र.क्र.०४/सीपीटीपी, दिनांक ०८.०४.२०१९

**प्रस्तावनाः-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे विविध संवर्गातील गट अ व गट ब पदांकरीता सरळ सेवेने शासनसेवेत नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांसाठी २ वर्षे कालावधीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी ) अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. राज्य सेवा परीक्षा, २०१३ अन्वये निवड झालेल्या उमेदवारांच्या “सीपीटीपी १, २०१४” या तुकडीपासून या प्रशिक्षण कार्यक्रमाची सुरुवात करण्यात आली आहे.

अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. या शासन निर्णयानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना त्यांच्या प्रशिक्षण कालावधीत द्यावयाच्या वेतनासंदर्भात तरतूद केली आहे

अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना त्यांच्या प्रशिक्षण कालावधीत द्यावयाच्या वेतनासंदर्भातील तरतूदींमध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार सीपीटीपी अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षण सुरु झाल्यापासून पायाभूत प्रशिक्षण, अनिवार्य संलग्नता या प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षणाच्या कालावधीत प्रति महिना गट अ करीता रु. ३०,०००/- व गट ब करीता रु.२०,०००/- ठोक वेतन देण्यात यावे. या अधिकाऱ्यांचे व्यावसायिक खातेनिहाय / तांत्रिक प्रशिक्षण या प्रशिक्षण

टप्प्यासाठी संबंधित विभागांकडे रुजू झाल्यापासून त्यांच्या पदाचे विहित नियमित वेतन संबंधित प्रशासकीय विभागांकडून प्रदान करण्यात यावे. तसेच ठोक वेतन व नियमित वेतन यामधील फरकाची रक्कम एकरकमी प्रदान करण्यात यावी अशी तरतूद करण्यात आली आहे.

अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविण्याच्या अनुषंगाने प्रशिक्षण टप्प्यांच्या कालावधीमध्ये सुधारणा केली आहे.

परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रदान करावयाच्या वेतनासंदर्भातील सेवार्थ नोंदी करणे, त्यांची परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना ( Defined Contribution Pension Scheme ) अंतर्गत कर्मचारी सांकेतांक प्राप्त करुन घेणे इ. तांत्रिक बाबींची पूर्तता करण्यास संबंधित प्रशासकीय विभागांना लागणारा कालावधी विचारात घेऊन परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या काळात विनावेतन रहावे लागू नये या उद्देशाने प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या प्रशिक्षण संस्थांमधील कालावधीकरीता या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना ठोक वेतन देण्याची तरतूद करण्यात आली आहे.

राज्य शासनाच्या अधिकारी /कर्मचारी यांना दिनांक १ जानेवारी, २०१९ पासून सातवा वेतन आयोग मंजूर करण्यात आला असून त्यानुसार सुधारित वेतननिश्चितीअन्वये वेतन प्रदान करण्यात येत आहे. सदर बाबी विचारात घेऊन एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षण कालावधीत प्रदान करण्यात येणाऱ्या ठोक वेतनाच्या रकमेमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

**<u>शासन निर्णय :</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्य सेवा परीक्षेमार्फत निवड झालेल्या व एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी ) अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या गट अ व गट ब संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रदान करावयाच्या ठोक वेतनामध्ये वाढ करण्यास शासन मान्यता देत आहे. त्यानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी ) अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या गट अ संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना रु. ४५,०००/- प्रति महिना व गट ब संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना रु. ३५,०००/- प्रति महिना ठोक वेतन प्रदान करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण सुरु झाल्यापासून पायाभूत प्रशिक्षण, अनिवार्य संलग्नता, महाराष्ट्र दिल्ली दर्शन या टप्प्यांचे प्रशिक्षण पूर्ण होईपर्यंतच्या १६ आठवड्यांच्या कालावधीसाठी प्रशिक्षण संस्थांमार्फत ठोक वेतन प्रदान करण्यात यावे. परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना त्यांच्या तांत्रिक प्रशिक्षणाच्या टप्प्यापासून संवर्गनिहाय पदाचे नियमित वेतन संबंधित प्रशासकीय विभागामार्फत देण्यात यावे. तसेच नियमित वेतन व ठोक वेतन यामधील फरकाची रक्कम संबंधित विभागांमार्फत परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना

एकरकमी प्रदान करण्यात यावी. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम सुरु झाल्यानंतर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ठोक वेतन प्रदान करण्यासाठी संवर्गनिहाय संबंधित विभागांनी गट अ साठी यशदा, पुणे व गट ब साठी वनामती, नागपूर यांना तात्काळ अग्रिम निधी उपलब्ध करुन द्यावा.

२. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षणासाठी रुजू झालेल्या अधिकाऱ्यांना नियमित वेतन अदा करण्यासाठी संबंधित प्रशासकीय विभागांकडून करण्यात येणाऱ्या कार्यवाहीसाठी काही कालावधी लागण्याची शक्यता विचारात घेऊन "यशदा" व "वनामती" या संस्थांकडून तात्पुरती व्यवस्था म्हणून ठोक वेतन देण्याची कार्यपध्दती ठरवली आहे. ठोक वेतन अदा करण्यात येत असलेल्या ह्या कालावधीतच संबंधित अधिकाऱ्यांना नियमित वेतन देण्यासंबंधीच्या तांत्रिक / प्रशासकीय बाबींची पूर्तता करण्याचे नियोजन संबंधित विभागांनी करावे. तसेच १६ आठवड्यानंतर अधिकारी नियमित वेतनापासून वंचित राहणार नाहीत याचीही दक्षता घ्यावी.

३. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी ) अंतर्गत समाविष्ट संवर्गांपैकी पोलीस उपअधिक्षक / सहायक पोलीस आयुक्त संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना पायाभूत प्रशिक्षणाच्या कालावधीत वर नमूद केल्याप्रमाणे ठोक वेतन प्रदान करण्यात यावे. तथापि, पायाभूत प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर नियमित वेतन गृह विभागाकडून सुरु करण्यात यावे.

४. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी ) अंतर्गत प्रशिक्षण सुरु होणाऱ्या पुढील तुकडीपासून सदर शासन निर्णय लागू राहिल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१५२१४०४००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.01.30 15:00:20 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ३२.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
४. अपर मुख्य सचिव (सेवा ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (महसूल/ गृह/ ग्राम विकास/ वित्त/ सहकार/ नगर विकास/ राज्य उत्पादन शुल्क/ परिवहन/ सामान्य प्रशासन/ शालेय शिक्षण/कौशल्य विकास व उद्योजकता/ उद्योग ऊर्जा व कामगार/ आदिवासी विकास).

६. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,

९. सहसचिव (अर्थसंकल्प) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

१०.उपसचिव (व्यय ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

११.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),

निवडनस्ती कार्यासन - सीपीटीपी.